सहयोगी प्राध्यापक व सहायक प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये तसेच सहायक प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये, महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा, गट -अ यांच्या बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२३/(प्र.क्र.९३/२३)/तांशि-१**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३० जून, २०२३

संदर्भ:- १) शासन आदेश क्रमांक:- बदली-२०२३/(प्र.क्र.७२/२३ )/तांशि-१, दि. ३०.०५.२०२३
२) शासन आदेश क्रमांक:- बदली-२०२३/(प्र.क्र.७५/२३ )/तांशि-१, दि. ३०.०५.२०२३
३) शासन आदेश क्रमांक:- बदली-२०२३/(प्र.क्र.७७/२३ )/तांशि-१, दि. ३०.०५.२०२३

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने महाराष्ट्र अभियांत्रिकी शिक्षक सेवा, गट-अ या संवर्गातील खाली नमूद अध्यापकांच्या बदल्या स्तंभ ३ नुसार करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | अध्यापकाचे नाव व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचा प्रकार |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| **सहायक प्राध्यापक,स्थापत्य अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय** | | | |
| १ | श्री.अमरसिंग बबनराव लांडगे, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव | प्रशासकीय बदली |
| **सहायक प्राध्यापक, अणुविद्युत अभियांत्रिकी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय** | | | |
| २ | श्री.राजेंद्र प्रभाकर चौधरी, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद | विनंती बदली |
| **सहायक प्राध्यापक, औषधनिर्माणशास्त्र, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय** | | | |
| ३ | श्री.योगेश विलास पोरे, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, रत्नागिरी | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, कराड | विनंती बदली |

२. खालील विवरणपत्रात नमूद सहयोगी प्राध्यापक व सहायक प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये /शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालये यांच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ व ३ येथील शासन आदेशान्वये करण्यात आलेल्या **बदल्या रद्द** करण्यात येत असून त्यांची **पदस्थापना स्तंभ ३ मध्ये नमूद केल्यानुसार कायम ठेवण्यात येत आहे:-**

| अ.क्र | अध्यापकाचे नाव व पदनाम | बदलीपूर्वीची कार्यरत संस्था | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.मिलींद राजाभाऊ बोनगुलवार, सहयोगी प्राध्यापक, उपकरणीकरण अभियांत्रिकी | शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर |
| २ | डॉ. किरण गजेंद्र आसुटकर, सहयोगी प्राध्यापक, स्थापत्य अभियांत्रिकी | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, नागपूर | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, यवतमाळ |
| ३ | डॉ. नंदकिशोर रामदास कोटगळे, सहयोगी प्राध्यापक, शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय, अमरावती | शासकीय औषधनिर्माणशास्त्र महाविद्यालय,रत्नागिरी |
| ४ | श्रीमती शितल प्रल्हाद बिजवे, सहायक प्राध्यापक, उपकरणीकरण | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती | शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी |
| ५ | श्रीमती निवेदिता प्रदिप वाघ, सहायक प्राध्यापक, उपकरणीकरण | शासकीय अभियांत्रिकी व संशोधन महाविद्यालय, अवसरी | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती |

३. सदर बदली आदेश तात्काळ अंमलात येतील.

४. उपरोक्त प्रमाणे प्रशासकीय बदली झालेल्या अध्यापकांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल. विनंती बदली झालेल्या अध्यापकांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

५. सदर बदली आदेशाची प्रभावीपणे अंमलबजावणी होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या अध्यापकांना संबंधित प्राचार्यांनी तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेल्या अध्यापकास कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तिकरीत्या संबंधित प्राचार्यांची राहील.

६. बदली झालेले अध्यापक त्यांच्या संबंधित संस्थेकडून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना संबंधित प्राचार्य यांनी विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अध्यापकास रुजू करुन न घेतल्यामुळे काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित प्राचार्य यांना जबाबदार धरण्यात येईल.

७. प्रस्तुत आदेशाची अंमलबजावणी प्रभावीपणे होण्याकरिता संबंधित सहसंचालक, विभागीय तंत्रशिक्षण कार्यालय यांनी पाठपुरावा करावा. तसेच, याबाबतचा कार्यपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत संचालक, तंत्रशिक्षण यांचेमार्फत शासनास सादर करावा.

८. बदली झालेल्या अध्यापकाची कोणतीही रजा शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय मंजूर करण्यात येऊ नये.

९. सदर बदल्यांचे आदेश निर्गमित झाल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीत, संबंधित अध्यापकांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी.

१०. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६३०२०३९३८०५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER LAXMAN DHERE

Digitally signed by SAMEER LAXMAN DHERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, pseudonym=B0341853BBBDA46EBB328D4BE0F460D863592476, serialNumber=6EE64CF9B42881125C3715A5DB341B5827C5743C728BC85F04BB71FF8FC154D6, cn=SAMEER LAXMAN DHERE
Date: 2023.06.30 20:42:09 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अध्यापक (संस्था प्रमुखामार्फत)

**प्रत,**

१) मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) सर्व सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालये (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
४) संबंधित प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षक), मुंबई / नागपूर, महाराष्ट्र १ /२.
६) प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी (तंत्र शिक्षण संचालनालयामार्फत)
८) निवड नस्ती - तांशि -१.